राज्यातील घाऊक केरोसिन परवानाधारकांचे
कमीशन सुधारीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रॉकेल-२०१८/प्र.क्र.३९२ / ना.पु.२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३० नोव्हेंबर, २०१८.

**वाचा –**

१) शासन निर्णय क्र .रॉकेल-२०१६/प्र.क्र.२९८/ना.पु.२७, दि.१५.०९.२०१७.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र.P-२००२८/२/२०००-PP(Vol.IV)(Pt.१), दि.०४.१०.२०१८.

**शासन निर्णय : -**

शासनाच्या संदर्भ (१) येथील शासन निर्णयान्वये घाऊक केरोसिन वितरकांच्या कमिशनमध्ये सुधारणा करण्यात आली होती.आता केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.(२) च्या पत्रान्वये घाऊक केरोसिन वितरकांच्या कमिशनमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे.

| सद्यस्थितीत घाऊक परवानाधारकांना मंजूर केलेले कमिशन (रुपये प्रति कि.ली.) | | केंद्र शासनाने घाऊक परवानाधारकांना मंजूर केलेले सुधारीत कमिशन (रुपये प्रति कि.ली.) | |
|---|---|---|---|
| फॉर्म १५ मधील परवाना असलेल्या वितरकांना | फॉर्म १५ व्यतिरिक्त इतर नमुन्यात परवाना असलेल्या वितरकांना | फॉर्म १५ मधील परवाना असलेल्या वितरकांना | फॉर्म १५ व्यतिरिक्त इतर नमुन्यात परवाना असलेल्या वितरकांना |
| **रु.१००८.८३/-प्रति कि.ली** | **रु.९२८.१०/-प्रति कि.ली** | **रु.१०१६.३७/-प्रति कि.ली** | **रु.१००५.९५/-प्रति कि.ली** |

२. केंद्र शासनाने केरोसिन घाऊक वितरकांच्या कमीशनमध्ये केलेल्या सुधारणेनुसार सर्व जिल्हाधिकारी तसेच नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई तसेच सर्व जिल्हाधिकारी यांनी सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत प्रचलित एक्स डेपो दर,त्यावरील वस्तु व सेवा कर,घाऊक वितरकांचे सुधारीत कमीशन,प्रचलित वाहतुक खर्च, प्रकरणपरत्वे अर्धघाऊक विक्रेत्यांचे कमीशन, किरकोळ विक्रेत्यांचे कमीशन व इतर अनुषंगिक बाबी विचारात घेऊन केरोसिनचे सुधारीत दर निश्चित करून त्याबाबत तातडीने अधिसुचना निर्गमित करावी व त्याची एक प्रत शासनास पाठवावी.

३. केंद्र शासनाने केरोसिन घाऊक वितरकांच्या कमीशनमध्ये सुधारणा करतांना फॉर्म १५ मधील परवाना असलेल्या वितरकांना व फॉर्म १५ व्यतिरिक्त इतर नमुन्यात परवाना असलेले वितरक यांना वेगवेगळे कमीशन निश्चित केले आहे.त्यामुळे एकाच क्षेत्रात फॉर्म १५ मधील परवाना असलेल्या वितरकांकडून व १५ व्यतिरिक्त इतर नमुन्यात परवाना असलेल्या वितरकांकडून

केरोसिनचा पुरवठा होत असल्यास, केरोसिनची दोन वेगवेगळया प्रकारची दरनिश्चिती टाळण्याच्या दृष्टीने सर्व धऊक वितरकांना रु.१०१६.३७ प्रती कि.ली.कमीशन गृहित धरून दर निश्चिती करावी. तथापि, फॉर्म १५ व्यतिरिक्त इतर नमुन्यात परवाना असलेल्या वितरकांना अनुज्ञेय कमीशनपेक्षा अतिरिक्त मिळणारी कमीशनमधील फरकाची रक्कम संबंधित वितरकांकडून वसूल करून शासनाकडे जमा करावयाची आहे.त्यानुसार ही रक्कम शासनाकडे जमा केली जात असल्याबाबत सर्व जिल्हाधिकारी तसेच नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांनी खातरजमा करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११३०१२१३१७१२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Hamid Husain Ghulam Ansari
Date: 2018.11.30 12:20:12 +05'30'

**( हामिद अन्सारी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व उपनगर वगळून)
३. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा मुंबई,
४. सर्व उप आयुक्त (पुरवठा),
५. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
६. सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी,
७. राज्य स्तरीय समन्वयक, तेलउद्योग महाराष्ट्र राज्य
८. मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
९. मा.राज्यमंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
१०.निवडनस्ती (ना.पु.२७).